

“खरं पहायला गेलं तर आम्ही एकाच व्यक्तीचे चार भाग आहोत..”
- पॉल मॅकार्टनी




अमेरिकेन संगीतात बीटल्सनं २० सिंगल चार्टस जिंकले होते.
– म्हणजे एल्व्हिसपेक्षा तीन जास्त..!


बीटल्स जिथे लहानाचे मोठे झाले ते लिव्हरपूल हे इंग्लंडमधलं प्रमुख औद्योगिक शहर होतं. इंग्लंडमधल्या इतर ठिकाणांच्या मानानं तिथे सर्वात जास्त संख्येनं कामगार होते.


मर्सीसाईड हा लिव्हरपूलचाच एक भाग होता. तिथे खूप क्लब होते. त्या क्लबमध्ये अनेक किशोरवयीन मुलांचे छोटे बँड होते. अगदी कमी पैशात ३५० बँड तिथे संगीत सादर करायचे.
मर्सी बीट हे वर्तमानपत्र तिथल्या संगीतप्रेमींना प्रिय होतं. पण बीटल्सनं लिव्हरपूल आणि वर्तमानपत्र हे दोन्ही आपल्याबरोबर प्रसिध्दीच्या शिखरावर पोचवलं.


लिव्हरपूलमध्ये एक रॉक कॉन्सर्ट झाली. बीटल्सचा पहिला मॅनेजर ॲलन विल्यम्स यानं सलग १४ तासांची एक रॉक कॉन्सर्ट खुल्या मैदानात आयोजित केली होती.
बीटल्स जिथे संगीत सादर करायचे ते जॅकरांडा आणि कॅव्हर्न हे क्लब्जही विल्यम्सच्या मालकीचे होते.

## जॉन लेनन



मूल जन्माला येईपर्यंत तू इथेच थांब.



जॉन लेनन १९४०च्या ऑक्टोबरमध्ये जन्माला आला. त्याचे वडील त्याच्या आयुष्यात येऊन जाऊन असायचे.

पाच वर्षांचा असताना तो आपल्या काकाकाकूंसोबत रहायला लागला.

मिमि आँटी, मी तुझ्यासाठी एक गोष्ट लिहिलीय. त्यात चित्रं ही मीच काढलीयत.



जॉनला रेखाटनं करायची आवड होती. त्याला संगीत ऐकायलाही खूप आवडत होतं.

तो ११ वर्षांचा असताना त्यानं बिल हेली आणि कॉमेटस यांच्या रेकॉर्डस ऐकल्या होत्या. नंतर त्याला एल्व्हिस प्रिस्लेच्या रेकॉर्डस सापडल्या.

तू परत “रॉक अराऊंड द क्लॉक” ऐकतोयस?

नाही. मला आत्ताच नवीन सापडलेलं ऐकतोय. एल्व्हिस प्रिस्ले हा गायक. तो अमेरिकन आहे आणि मस्त गातो.



तू मला भेटायला आलास म्हणून आनंद झाला. आई, माझी तुला एक विनंती आहे तू मला गिटार घेऊन देशील का?

बाळा, महागडी नसेल तर नक्की घेऊन देईन.



गिटार वाजवणं ठीक आहे जॉन. पण त्यातून तुला कधीच पैसे मिळणार नाहीत.



सोळा वर्षांचा असताना जॉननं क्वारीमेन नावाचा एक संगीताला वाहिलेला ग्रुप तयार केला. १९६८ साली त्याची आई मोटारअपघातात मरण पावली. त्याचं सांत्वन करणारा त्याचा मित्र होता – पॉल मॅकार्टनी.


पॉल मेकार्टनी


पॉल मॅकार्टनी १९४२च्या जूनमध्ये जन्माला आला होता. तो अभ्यासात हुशार होता. पण त्याला शाळेचा कंटाळा यायचा.
पॉल, तू यापेक्षा कितीतरी चांगले गुण मिळवू शकशील.
मी संगीताबद्दल विचार करत होतो.


त्याच्या आईनं त्याला पियानो, बँजो आणि गिटार वाजवायला शिकवली होती.
नर्स असून तू खूप चांगला पियानो वाजवतेस.
तू सुध्दा काही वाईट वाजवत नाहीस.


पॉल १४ वर्षांचा असताना त्याची आई मरण पावली. त्या दु:खावर उतारा म्हणून तो पियानोवादनात बुडून जायचा.
'क्वारीमेन'साठी मला अजून एक गिटारवादक हवा आहे. तू येतोस का आमच्यासोबत?
का नाही? आपण काही चांगली गीतंही लिहू.
मग पंधरा वर्षांचा असतानाच पॉल 'क्वारीमेन'मध्ये आला.










जॉर्जनं क्वारीमेनचं नाव बदलून "सिल्व्हर बीटल्स" आणि नंतर बीटल्स केलं. बीटल्समधला बीट - ताल. तालमय संगीत म्हणजे बीटल्स.

मर्सीसाइडमधल्या अनेक क्लब्जमध्ये बीटल्सचे जलसे व्हायचे. जॉन, पॉल आणि जॉर्ज यांना गिटारवर जॉर्ज सटक्लिफ आणि ड्रमवर टॉमी मूर साथ करायचे.



१९६० साली ॲलन विल्यम्स या त्यांच्या मॅनेजरनं हॅंबर्ग, जर्मनीमधल्या म्युझिक क्लबमध्ये कार्यक्रम करायची संधी मिळवून दिली. तेव्हा ड्रमवर टॉमीऐवजी पीट बेस्ट होता.




जर्मन लोकांना आपल्या ड्रिंक आणि डान्स अशा क्लबजमध्ये वरच्या स्वरातलं तालमय संगीत हवं होतं. बीटल्सनं त्यांची ती अपेक्षा पूर्ण केली.




बीटल्स तर्‍हेतर्हेचे प्रकार वाजवून हिटलरची थट्टा करत होते ते जर्मन लोकांना आवडलं होतं.

बीटल्स खूप थकले होते. आठवड्यातले सातही दिवस कधीकधी आठआठ तास ते कार्यक्रम सादर करत होते. ज्या क्लबमध्ये ते सादर करायचे तिथेच खालच्या अपार्टमेंटसमध्ये रहायचे.

एका प्रतिस्पर्धी नाईटक्लबमध्ये गात असताना जॉर्ज हॅरिसन हा गाण्यासाठी अल्पवयीन असल्याची बातमी पसरली. जॉर्जकडे  वर्क व्हिसा नसल्यामुळे त्याची इंग्लंडमध्ये हकालपट्टी झाली. स्टुअर्टनं हॅम्बर्गमध्येच बीटल्सबरोबर वाजवणं सोडलं होतं. त्यामुळे लवकरच तो सोडून इतर सगळ्यांनी जॉर्जचीच परतीची वाट धरावी लागली.

दरम्यान संगीताच्या रेकॉर्डस विकणार्‍या एका दुकानाच्या मालकाला, ब्रायन एपस्टाईनला त्यानं पूर्वी कधीच न ऐकलेल्या ग्रुपबद्दल विचारणा होत होती. मग त्यानं विचारणा सुरु केली.




एपस्टाईनला हा काय प्रकार आहे ते पहायचं होतं. तो या बँडला ऐकायला दुकानाजवळच्या कॅव्हर्न क्लबमध्ये गेला. एपस्टाईनला त्यांच्यात प्रचंड क्षमता जाणवली.




बीटल्सनं ते मान्य केलं आणि २४ जानेवारी १९६२ रोजी करारावर सह्या झाल्या.




ब्रायननं ॲलन विल्यम्सला फोन केला. तो आता बीटल्सचा मॅनेजर नव्हता. विल्यम्सचे त्या बँडशी काही संबंध नाहीत हेच ब्रायनला तपासायचं होतं.

ब्रायन एपस्टाईन यानं बीटल्सची प्रतिमा बदलण्याचा चंग बांधला. ते जरा नीटनेटके लोकांसमोर आले तर सर्वसामान्य जनतेला ते आवडेल असं त्याला वाटत होतं.




एपस्टाईननं अनेक रेकॉर्डिंग कंपन्यांना बीटल्सबद्दल विचारलं. सगळ्यांनी नकार दिला.
बीटल्स एक दिवस एल्व्हिस प्रिस्लेपेक्षा मोठे होतील हे तुमच्या लक्षात यायला हवं.
ब्रायन, तू आपलं परत तुझं दुकान चालवायला लाग.


अखेर एपस्टाईनं इएमआय कंपनीच्या जॉर्ज मार्टिनला बीटल्स ऐकावेत अशी गळ घातली.
त्यांच्यात काहीतरी खास आहे. मी त्यांचा रेकॉर्डिंग मॅनेजर व्हायला तयार आहे.


जॉन, पॉल आणि जॉर्ज पीट बेस्टवर जरा नाराज होते.
आपण एक ग्रुप आहोत. पीट हे विसरतो.
एकटाच वाजवतोय असं तो वाजवत असतो.


पीट बेस्ट ग्रुपमध्ये योग्य नाही असं मार्टिनचंही मत होतं. एपस्टाईनला पीट आवडत होता पण त्याला सोडण्याशिवाय पर्याय नव्हता.
पीट सॉरी. पण इएमआय कंपनी सांगते तसं करावं लागेल.
ठीक आहे. मी दुसरं काम शोधेन.


१९६२ सालच्या ऑगस्टमध्ये रिंगो स्टार बीटल्सचा ड्रमर झाला. नंतर त्याला 'लकीएस्ट अननोन ड्रमर इन द वर्ल्ड' असं म्हणलं गेलं. बीटल्समधला चौथा म्हणवण्याइतकी कला त्याच्या अंगात नक्कीच होती.


रिंगो स्टार


रिची स्टार्की १९४०च्या जुलैमध्ये जन्माला आला. नंतर त्याला रिंगो स्टार म्हणायला लागले.
माझ्याबरोबर खेळायला एखादा भाऊ किंवा बहीण असती तर..
तू आहेस हे खूप आहे आमच्यासाठी. आपल्याकडे एक बाथरूम असती तर..


आजारांनी ग्रस्त असल्यामुळे रिंगो किशोरवयीन होईपर्यंत त्याच्या हॉस्पिटलच्या फेर्‍या चालायच्या.
तो घरी जाण्याइतका बरा झालेला नाही.


रिंगोची बीटल्सबरोबर पहिली भेट हॅंबर्गमध्ये झाली. तो तिथे दुसर्‍या एका ग्रुपसाठी ड्रम वाजवत होता.
मी हा क्लब सोडतो. त्या खोल्या इथल्यापेक्षा वाईट आहेत. त्यापेक्षा लिव्हरपूल परवडलं.
तुला मॉरीन कॉक्समुळे लिव्हरपूल आवडतं का?


संगीत सादर करणारे ग्रुप दुसऱ्याकुणीतरी लिहिलेली गीतं रेकॉर्ड करायचे.
बीटल्सला योग्य असं गाणं मला सापडतच नाहीये.
मार्टिननं मग बीटल्सला जॉन आणि पॉलचं “लव्ह मी डू” रेकॉर्ड करायला परवानगी दिली.
यापूर्वी कोणत्याच ग्रुपनं स्वत: लिहिलेलं गाणं रेकॉर्ड केलं नव्हतं.
सगळे संगीताचे ग्रुप्स एक दिवस स्वत:ची गाणी स्वत: लिहितील


१९६३च्या जानेवारीत बीटल्सची “प्लीज, प्लीज मी” ही रेकॉर्ड युनायटेड किंग्डममध्ये पहिल्या क्रमांकावर पोचली. फेब्रुवारीमध्ये ते देशभराच्या दौऱ्यावर गेले.
माझा विश्वासच बसत नाहीये..
अजून पोलिस हवे होते.
मे महिन्यात त्यांच्या तिसऱ्या दौऱ्याच्या वेळी त्यांचा कार्यक्रम हाऊसफुल्ल होता. चाहते बेभान होऊन बेशुध्द पडतायत, दंगा सुरु होतोय असे प्रकार तिथे चालू झाले.. ती बीटलमॅनियाची सुरुवात होती.

आॅक्टोबरमध्ये बीटल्स ब्रिटिश टेलिव्हिजनवर झळकले.




लंडन पॅलॅडियममध्ये “संडे नाईट” हा बीटल्सचा कार्यक्रम होता. तिथे दिवसभर प्रेक्षकांची वर्दळ होती.

स्वीडनच्या यशस्वी दौर्‍यावरुन परत आले तेव्हा विमानतळावर माणसांची गर्दी जमली होती.




डिसेंबरमध्ये बीटल्स रॉयल व्हरायटी शोमध्ये झळकले. इंग्लंडची राणी एलिझाबेथ, तिची आई, राजकुमारी मार्गारेट आणि लॉर्ड स्नोडेन हे त्या कार्यक्रमात होते.




“वुईथ द बीटल्स” या दुसर्‍या अल्बमसाठी अडीच लाख लोकांनी नोंदणी केली होती. एल्व्हिस प्रिस्लेच्या ब्लू हवाई या गाजलेल्या रेकॉर्डला या प्रकाराने मागे टाकलं.



“आय वाँट टू होल्ड युअर हँड” या एका गाण्यासाठी १० लाख लोकांनी नोंदणी केली.

डिसेंबरमध्ये बीटल्स ख्रिसमस शो नंतर “लंडन टाईम्स”नं बीटल्सला १९६३ सालचे आगळेवेगळे इंग्लिश संगीतकार म्हणून गौरवलं.



“संडे टाईम्स”नं त्यांना बीथोव्हेननंतरचे सर्वात महान संगीतकार म्हणलं

बीटल्सची चार गाणी अमेरिकेत गाजल्यानंतर ब्रायन एपस्टाईननं त्यांचा पहिला अमेरिका दौरा आखला. केनेडी विमानतळावर त्यांच्या स्वागताला १०,००० फॅन्स होते.

९ फेब्रुवारी १९६४ - टेलिव्हिजनच्या एड सुलिव्हन शोमध्ये ७ करोड़ लोकांनी बीटल्सचा कार्यक्रम पाहिला.




"वॉशिंग्टन कोलेसियम" त्यांच्या जलशासाठी भरलं होतं.




जलसा झाल्यानंतर ब्रिटिश एंबसीनं त्यांच्यासाठी पार्टी ठेवली होती. रिंगोच्या केसांचा एक झुपका तिथे एका तरुणीनं कापून घेतला.



न्यूयॉर्कच्या कार्नेजी हॉलमध्ये भरगच्च प्रेक्षागृहात दोन कार्यक्रम झाल्यावर बीटल्सनी एड सुलिव्हनच्या मायामी बीचवर चित्रित झालेल्या कार्यक्रमात परत हजेरी लावली.

ते संपल्यावर ते एका खाजगी बोटीत विश्रांती घ्यायला थांबले.




त्यांच्या सुरक्षेसाठी तैनात केलेल्या पोलिस अधिकाऱ्यानं त्यांना डिनरसाठी घरी आमंत्रित केलं.



इंग्लडला परत गेल्यावर बीटल्सला गर्दीनं घेरलं.




जॉन लेननचं लिहिलेलं इन हिज ओन राईट हे पुस्तकही तितकंच गाजत होतं.




HONGKONG

EUROPE

AUST

बीटल्सनं युरोप, हाँगकाँग, ऑस्ट्रेलिया आणि न्यूझीलंडचे दौरे केले. गर्दी आणि त्यांच्या नावाचा पुकारा करणारे फॅन्स हे दृश्य सगळीकडे कायम होतं.

जगभर बीटल्सची केशभूषा, शर्टस, टाय आणि क्यूबन शूज यांची फॅशन होती.




१९६४ साली बीटल्सचा ‘अ हार्ड डेज नाईट’ हा चित्रपट प्रदर्शित झाला. समीक्षकांनी त्याची स्तुती केली. रिचर्ड लेस्टर त्याचा दिग्दर्शक होता.
मार्क्स ब्रदर्ससारखी त्यांच्यात एक जादू होती.
पॉप स्टार्सवरचे चित्रपट सहसा चालत नाहीत. पण त्यांच्यावरचा चित्रपट वेगळा आणि ओरिजिनिल होता.


‘अ हार्ड डेज नाईट’ बीटल्सवरच होता. पण त्यात ते एकमेकांची चेष्टामस्करी करत होते.
स्वतःच्या यशामुळे बंदिस्त झालेले बीटल्स त्यात दिसले. चित्रपटात त्यांच्यामागे सतत फॅन्स दिसतात, पत्रकारांच्या फालतू प्रश्नांना उत्तरं देतात आणि सत्तेत असलेली माणसं त्यांचा कमी लेखत असतात.

१९६४च्या ऑगस्टमध्ये अमेरिकन दौर्‍यात त्यांनी २४ शहरांमध्ये ३१ कार्यक्रम सादर केले. सगळीकडे प्रेक्षकांनी रेकॉर्डब्रेक गर्दी केली होती.




पत्रकारांना ही मुलं चांगली वागणारी पण विचित्र वाटली.




बीटल्स हात लावतील तिथून पैसा निघत होता




बीटल्स जिथे राहिले होते तिथल्या हॉटेलमालकानं एका उशीचे १६० चौकोनी तुकडे केले. प्रत्येक तुकडा एक डॉलरला विकला.

इंग्लंडमध्ये बीटल्ससारखी केशभूषा केलेल्या अनेक युवकांना कामाच्या ठिकाणी केसांवर जाळी घालावी लागत असे.

जगभर बीटल्सचे चाहते बीटल्सची पोस्टर्स, मासिक, पुस्तकं विकत घेत होते. त्यांच्या कपड्यांची आणि केशभूषेची फॅशन निघाली होती.

“अ हार्ड डेज नाईट” या अल्बमनंतर बीटल्सच्या संगीताचा प्रकार बदलला. त्यांनी जास्त प्रमाणात बॅलडस गायला सुरुवात केली. संगीतही तितकंसं सोपं राहिलं नाही.

मला अजूनही “शी लव्हज यू” सारख्या सुरुवातीच्या रेकॉर्डस आवडतात.

पण पॉलचं “यस्टरडे” ऐकलंस का? ते गमावलेल्या प्रेमाबद्दल आहे.

तू “रबर सोल” अल्बम ऐकलास का?

त्यांच्या संगीताला प्यूक एलिंग्टन आणि लिओनार्ड बर्नस्टीनसारखे दिग्गजही नावाजत .

द बीटल्स? ग्रेट आहेत.

द बीटल्स? गेल्या काही वर्षातला सर्वात ओरिजिनल ग्रुप.

द बीटल्स इतर अनेक गायक आणि संगीताच्या ग्रुप्सपेक्षा वेगळे होते. विशेष म्हणजे स्त्रिया, पुरुष, मुलं, पालक, आजीआजोबा – सगळ्यांना ते प्रिय होते.



१९६६ सालच्या अमेरिका दौऱ्यानंतर, बीटल्समधले सगळेच करोडपती झाले होते. लोकप्रियता त्यांना अर्थातच आवडत होती. पण त्याबरोबर समस्याही होत्या.




रिंगोनं त्याच्या मॉरीन कॉक्स या लिव्हरपूलमधल्या प्रेयसीशी लग्न केलं. त्यांना झॅक आणि जेसन ही दोन मुलं होती.




१९६५ साली बीटल्सना एमबीई – मेंबर्स ऑफ द मोस्ट ऑनरेबल ऑर्डर ऑफ द ब्रिटिश एंपायर हा किताब इंग्लडची राणी क्वीन एलिझाबेथच्या हस्ते मिळाला.






एमबीई मिळवलेल्या अनेक माजी विजेत्यांना पॉप ग्रुपला हा किताब मिळावा हे रुचलं नाही. त्यातल्या काहीजणांनी आपली पदकं परत पाठवली.




१९६५ च्या आॅगस्टमध्ये बीटल्सचा न्यूयाॅर्कच्या शिआ स्टेडिअममध्ये कार्यक्रम होता. उन्मादानं बेहोश होणार्‍या तरुणींना उचलून नेण्यात पोलिस मग्न होते.




डिसेंबरमध्ये बीटल्सचा इंग्लंडमधला शेवटचा कार्यक्रम झाला.

१९६५ सालच्या आॅगस्टमध्ये बीटल्सचा “हेल्प” हा चित्रपट प्रदर्शित झाला. रिचर्ड लेस्टरनंच हा चित्रपट दिग्दर्शित केला होता. “अ हार्ड डेज नाईट” इतका चालला नसला तरी हा चित्रपट बरा चालला.



“हेल्प” हा ब्रिटिश गुप्तहेर धर्तीचा चित्रपट होता. रिंगो घालत असलेल्या एका अंगठीभोवती हा चित्रपट फिरतो. एका माथेफिरु शास्त्रज्ञाला ती अंगठी हवी असते.




जॉननं एक चुकीचं विधान केल्यानं मात्र अनेकांना राग आला होता.










जॉननं तेव्हा जाहीर माफी मागितली. आपल्याला धर्माचा अनादर करायचा नव्हता असं त्यानं समजावून सांगितलं.

१९६६ साली जॉर्ज हॅरिसननं पट्टी बॉईड या ब्रिटिश मॉडेलशी लग्न केलं. नंतर ते दोघं भारतात आले.







भारतात हॅरिसन पतीपत्नी महर्षींकडे शिकले. ते प्रसिध्द अध्यात्मिक गुरु होते. नंतर सगळे बीटल्स त्यांच्याकडे शिकले.

“रिव्हॉल्व्हर”, “सार्जंट पेपर्स लोनली हार्टस क्लब बँड”, “स्ट्रॉबेरी फील्डस फॉरएव्हर”, “बीईंग वुईथ बेनिफिट आॅफ मि काईट”, “ल्यूसी इन द स्काय वुईथ डायमंडस” अशा अनेक रेकॉर्डस आणि गाणी त्यांनी प्रकाशित केली.




जुलैमध्ये बीटल्सचा टीव्ही कार्यक्रम “अवर वर्ल्ड ” -१५० मिलियन लोकांनी पाहिला होता.



ब्रायन एपस्टाईन अचानक १९६७च्या ऑगस्टमध्ये मरण पावला. बीटल्सना त्याची मॅनेजमेंट आणि मोलाची मैत्री कायम स्मरणात राहिली.

१९६७च्या डिसेंबरमध्ये “द मॅजिकल मिस्टरी टूर” ब्रिटिश टेलिव्हिजनवर दाखवली. या फिल्मचं लेखन, दिग्दर्शन बीटल्सनं केलं होतं. त्यात त्यांनी भूमिकाही केल्या होत्या. पण चित्रपट बनवायचा त्यांना अनुभव नव्हता. हा चित्रपट कोसळला.
.




या टीव्ही कार्यक्रमानंतर बीटल्सनं “ॲपल कॉर्पस” या नवीन कंपनीची घोषणा केली. पॉल या कंपनीचा प्रमुख होता.




आपलं संगीत रेकॉर्ड करण्यापलीकडे जाऊन लोकांना चांगल्या कल्पना सुचवून मदत करावी असा त्यांचा हेतू होता.

पण ॲपल कॉर्पस १९६८ साली बंद करावी लागली. यानं ते जरा निराश झाले.




१९६८ साली सगळे बीटल्स भारतात शिकायला आहे.



१९६८ च्या जुलैमध्ये “द यलो सबमरीन” हा कार्टून चित्रपट
बीटल्सनं प्रदर्शित केला.




या चित्रपटामुळे संगीतातून मिळणारं सौख्य आनंदापासून वंचित ठेवणार्‍या गोष्टींवर मात करतं. बीटल्सचे चित्रपट अनोखे आणि एकमेव होते.

१९६९ साली जॉन लेनन यानं योको ओनोबरोबर लग्न केलं.




पॉल मॅकार्टनीनं लिंडा इस्टमनसोबत लग्न केलं. ती एक अमेरिकन छायाचित्रकार होती.






१९७०च्या मे महिन्यात बीटल्सचा “लेट इट बी” चित्रपट प्रदर्शित झाला. बीटल्सपैकी कोणीच प्रिमिअरला गेलं नाही. हा चित्रपट डॉक्युमेंटरीसारखा होता. बीटल्स एकमेकांबरोबर काम करताना, हसतखेळत थट्टामस्करी करताना त्यात दिसत होते. त्यात जॉन आणि पॉल यांचं एकमेकांत पटत नाही हेही दिसत होतं.




यानंतर द बीटल्समधल्या सगळ्यांनी ग्रुपपासून वेगळं होत स्वतंत्र अल्बम्स केले.




१९७०च्या डिसेंबरमध्ये पॉलनं बीटल्स हा यापुढे एक ग्रुप नसावा असा कोर्टात अर्ज दाखल केला.




दुसर्‍या कोणत्याही ग्रुपनं सोडून गेलेल्या सदस्याच्या जागी दुसर्‍या कोणाला तरी घेतलं असतं. पण बीटल्स हा ग्रुप जॉन लेनन, पॉल मॅकार्टनी, जॉर्ज हॅरिसन आणि रिंगो स्टार यांचा बनला होता. इतर कोणाला ते जमलं नसतं.

**जॉन लेनन**

८ डिसेंबर १९८० रोजी लेननचा न्यूयॉर्कमध्ये गोळी झाडून खून करण्यात आला. १९७१ सालच्या "इमॅजिन" या त्याच्या गाण्याला या घटनेनं नवीन अर्थ प्राप्त करुन दिला.

**रिंगो स्टार**

आजही संगीत, टीव्ही आणि चित्रपट या क्षेत्रांमध्ये काम करतो. अनेक ड्रमर्स आपल्यावर रिंगोचा प्रभाव मान्य करतात.



**जॉर्ज हैरिसन**

हॅरिसन फुफुसांच्या कर्करोगानं २१ नोव्हेंबर २००१ रोजी मरण पावला. एकमेकांवर प्रेम करा.. इतर सगळं थांबवता येतं, पण देवाचा शोध घेणं कधीच थांबत नाही असं तो नेहमी म्हणायचा.

**पॉल मेकार्टनी**

सर पॉल आजही क्लासिकल, इलेक्ट्रॉनिक, पॉप आणि चित्रपट या सर्व प्रकारात उत्साहानं काम करतो. १९९७ साली क्वीन एलिझाबेथच्या हस्ते त्याला "सर" हा किताब प्रदान करण्यात आला.